आदिवासी क्षेत्र उपयोजना आदिवासी/ क्षेत्राबाहेरील उपयोजना २०१५-२०१६ चे जिल्हानिहाय व योजनानिहाय अर्थसंकल्पीय तरतुदीचे वाटप **"नगर विकास"**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.०७/कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीख: **०७ मे,२०१५**

**वाचा -**

१) वि.वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थ-३, दि.३०.३.२०१५.

२) वि.वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५

**शासन निर्णय -**

आदिवासी उपयोजनांतर्गत **"नगर विकास"** या उपशिर्षाखाली २०१५-१६ च्या अर्थसंकल्पीय अंदाजात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीचे व योजनांचे जिल्हावार वाटप आणि प्रत्येक योजनांचे नियंत्रण अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत.

२. आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील **"नगर विकास"** या उपशिर्षाखालील योजनांना सोबतच्या विवरण पत्रातील स्तंभ क्र.२ मध्ये दर्शविलेल्या तरतुदी वितरणास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच ती रक्कम स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रण अधिका-यांच्या अधिनस्त ठेवण्यास मंजूरी देत आहे.

३. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी उपयोजना क्षेत्रत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, संबंधित प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्रकल्प व संबंधित जिल्हाधिकारी व नियोजन अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हा योजनांसाठी उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती

जिल्हाधिकारी तसेच नियोजन अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. विभागाच्या दिंनाक १६ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयाव्दारे जिल्हास्तरीय योजना जिल्हाधिकारी यांच्याकडे राबविण्यासाठी देण्यात आल्या आहेत. जिल्हा योजनांसाठी प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना देण्यात आलेले असल्यामुळे योजनेसाठी केलेली तरतूद त्याच योजनेवर त्याच जिल्ह्यात खर्च करणे बंधनकारक राहिल. त्यानुसार जिल्हा योजनेसाठी केलेली तरतूद जिल्हाधिकारी यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली आहे. तथापि,जिल्हास्तरीय योजनेतील कामांची तपासणी करण्याचे अधिकार व जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी तसेच प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त व,आदिवासी विकास नाशिक यांची संयुक्तीकरित्या राहिल.

६. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्र शासनाला कळविता येईल.

७. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त नियंत्रण अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

८. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०७११३४३९६२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashank Ramakant Sawant

Digitally signed by Shashank Ramakant Sawant
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shashank Ramakant Sawant
Date: 2015.05.07 14:09:59 +05'30'

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

प्रत,

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.

३. विभागीय आयुक्त, मुंबई/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/पुणे.

४. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, पालघर/ नाशिक/ नंदूरबार/ अमरावती/ नांदेड.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/ नाशिक/ नंदूरबार/ अमरावती/ नांदेड.

६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. / नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. कार्यासन अधिकारी का.क्र. २ व १७ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.

९. संचालक, नगर रचना, पुणे

१०. निवड नस्ती (का-६)

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २०१५-१६ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप (टि.एस.पी.)

| **शिर्ष :-** नगर विकास<br>**योजनेचे नांव :-** विकास योजना कार्यान्वित करण्यासाठी नगरपालिकांना वित्त सहाय्य (आदिवासी क्षेत्र)<br>**(जिल्हास्तरीय योजना) (रुपये हजारात)** | | **मागणी क्रमांक :-** **टी -** ५<br>**मुख्य लेखाशिर्ष :-** २२१७-नगर विकास-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- ८०- सर्वसाधारण-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) विकास योजना कार्यान्वित करण्यासाठी नगरपालिकांना वित्त सहाय्य<br>**(२२१७ ०२८१) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)** | | |
|---|---|---|---|---|
| **जिल्हयाचे नांव** | **२०१५-१६ साठी केलेली तरतूद** | **२०१५-१६ ची अर्थसंकल्पीय तरतूद सुर्पूद करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| पालघर | २०० | संबंधित जिल्हाधिकारी | नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | . |
| नाशिक | १०० | | | |
| नंदुरबार | १५० | | | |
| अमरावती | १०० | | | |
| नांदेड | ३०० | | | |
| **एकुण** | ८५० | | | |

------------